सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीत नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत. (लेखाशिर्ष २२१५ए२०१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२४/प्र.क्र. ३१ /पापु-१४**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २७ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः टंचाई/२०१८/प्र.क्र.१९१/पापु-१४, दिनांक: २७ नोव्हेंबर, २०१८.
३) जिल्हाधिकारी कार्यालय, धाराशिव यांचे पत्र क्रमांक: जा.क्र.२०२३/नपप्र/कार्या-१/पाणी टंचाई/कावि-२५, दि. २७.०१.२०२५.

**प्रस्तावाना:-**

राज्यातील नागरी भागातील पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च (२२१५ ए २०१) या लेखाशीर्षाखाली या विभागाकडून उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात येतो. सन २०२३-२४ च्या टंचाई कालावधीत प्रत्यक्षात पुर्ण केलेल्या उपाययोजनांसाठी छत्रपती संभाजीनगर विभागाचा निधी मागणीचा प्रस्ताव विभागास प्राप्त झाला आहे. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात, लेखाशीर्ष ( २२१५ ए २०१) ३१, सहायक अनुदाने (योजनेत्तर) या उद्दीष्टांतर्गत अर्थसंकल्पीय केलेला निधी विभागीय आयुक्त छत्रपती संभाजीनगर यांनी मागणी केलेल्या व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहीत केलेल्या निकषानुसार विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांना त्यांच्या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ प्रत्यक्षात पुर्ण केलेल्या उपाययोजनांवरील खर्च (**लेखाशिर्ष २२१५ ए २०१**) **अंतर्गत रुपये १०२.७५ लक्ष (अक्षरी रूपये एक कोटी दोन लक्ष,पंचाहत्तर हजार फक्त )** इतका निधी प्रचलित स्थायी शासन निर्णयामध्ये विहीत केलेल्या अटी व शर्ती तसेच खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

(रक्कम रु.लाखात)

| अ.क्र | विभाग | जिल्हा | नगरपंचायत | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १. | छत्रपती संभाजीनगर | धाराशिव | लोहारा | १०२.७५ |
| **एकूण** | | | | १०२.७५ |

## अटी व शर्ती

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी नागरी भागातील टंचाई अंतर्गत उपाययोजनांसाठीचा निधी संबंधित जिल्हाधिकारी यांना थेट वितरीत करण्यात यावा.

२) ज्या नागरी उपाययोजना नगरपरिषद/नगरपंचायत यांचे मार्फत राबविण्यात येत आहे. त्याकरिता विभागीय आयुक्त यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. जिल्हाधिकारी यांनी सदर निधी संबंधित मुख्याधिकारी,नगरपरिषद/नगरपंचायत यांना वितरीत करावा.

३) **सन २०२३-२४** या टंचाई कालावधीसाठी नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ टँकरने पाणी पुरवठा करणे या उपाययोजनेसाठी सदर निधी वितरीत करण्यात यावा. अन्य टंचाई कालावधीतील उपाययोजनांसाठी सदर निधी खर्ची टाकता येणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

४) विभागीय आयुक्त यांनी निधी टँकरने पाणी पुरवठा करणे या उपाययोजनेसाठी वितरीत करावा.

५) सदर निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account ) अथवा बँक खात्यात न ठेवता तो कंत्राटदारांना थेट Electronic Clearing Services/RTGS द्वारे वितरीत केला जाईल याची दक्षता घ्यावी.

६) निधीचे वितरण करतांना यापूर्वी संबधित उपाययोजनांना निधी वितरित करण्यात आलेला नाही याची खातरजमा करावी. यापुढे निधी मागणी करताना यापूर्वी उपाययोजनेवर खर्च झालेला नाही याची खातरजमा करुन तसे प्रमाणित केलेले प्रमाणपत्र निधी मागणी सोबत सादर करावे.

७) यापुढे टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांकरिता निधीची मागणी करतांना, टंचाई निवारणार्थ कोणत्या प्रस्तावित उपाययोजना कोणत्या कालावधीसाठी घ्यावयाच्या आहेत, त्यासाठी किती निधीची आवश्यकता आहे याबाबत बाब निहाय/ उपाययोजनानिहाय मागणी तसेच चालू आर्थिक वर्षात वितरीत करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती, तसेच त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावीत. त्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी.

८) यापुढे निधी मागणी करताना जर १ वर्षपेक्षा अधिक काळासाठी निधी मागणी प्रलंबित असेल तर कारणमिमांसासह निधी मागणी करण्यात यावी.

---

९) **सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे/पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरीता जो निधी वितरीत करण्यात आला आहे, त्यामधून देयके अदा करताना खाजगी टँकरवर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असेल व जी.पी.एस.प्रणालीवर ज्या टँकरच्या फे-यांची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. पाणी पुरवठा करणा-या ज्या टँकरवर जी.पी.एस.प्रणाली बसविलेली नाही किंवा जी.पी.एस.प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फे-या झाल्याचा दावा केला असल्यास, अशा फे-या अनुज्ञेय ठरणार नाहीत. तसेच जी.पी.एस. प्रणालीची नोंद होत नाही म्हणून देयके प्रमाणित करण्यात येऊ नये व अशा प्रकारे प्रमाणित केलेल्या देयकांसाठी निधी वितरीत करण्यात येऊ नये.**

१०) **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी टंचाई कालावधी सन २०२३-२४ करिता वितरीत करण्यात येत असल्याने व प्रत्यक्षात पूर्ण झालेल्या उपाययोजनांसाठी असल्याने सदर निधी १० दिवसांत खर्ची टाकण्यात यावा. यास्तव सदर निधी त्वरित चार दिवसांत संबंधित कार्यालयांना/जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र, दिनांक १५ एप्रिल, २०२५ पूर्वी शासनास सादर करावी.**

११) **नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ उपलब्ध करण्यात आलेल्या तरतूदीतून मागील वर्षात घेण्यात आलेल्या विविध योजना / पाणी पुरवठा विषयक कामे पूर्ण करण्यात आली असल्याचे जिल्हाधिकारी यांनी खात्री करावी.**

१२) **पाणी जीवनावश्यक / अत्यावश्यक बाब असल्याने, त्या आडून गैरप्रकार होणार नाहीत, त्याच त्याच योजना पुन्हा- पुन्हा दरवर्षी घेण्यात येत नाहीत व त्यावर अनावश्यक खर्च करण्यात येत नाही, याची खात्री संबंधित विभागीय आयुक्त/ जिल्हाधिकारी यांनी करावी.**

१३) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्तांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपद्धतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणा-या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे त्रैमासिक पडताळणी विहीत प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. **वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहीत वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.** आवश्यक तेवढ्याच निधीची मागणी करावी. अधिक निधी बाबतची मागणी करण्यात येऊ नये.

१४) क्षेत्रीय कार्यालयांच्या प्राप्त मागणी नुसार सदर निधी वितरीत करण्यात येत असला तरी , टंचाई कालावधी सन **सन २०२३-२४** करिता आवश्यक तेवढाच निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे आहरित करावा. अतिरिक्त निधी आहरित केल्यास व अखर्चित राहिल्यास त्याबाबत संबंधितांविरुद्ध शिस्तभंगच्या कार्यवाहीकरिता सक्षम प्राधिकाऱ्यांना प्रस्ताव सादर करावा. या कार्यवाहीबाबत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागास अवगत करावे.

---

१५) सदर वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबत उपाययोजनानिहाय, टंचाई कालावधीनिहाय माहिती उपलब्ध करुन द्यावी.

१६) याबाबतचा खर्च या शासन निर्णयातील निधी वितरण बाबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावा.

१७) **याबाबत होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, (०२) (११) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी महानगरपालिका/ नगर परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२१५ए२०१)या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.**

१८) आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार / उप कोषागार अधिकारी यांच्याकडे पाठविण्यात येणा-या व देयकासोबत जोडल्या जाणा-या संगणक स्लीपमध्ये गौण / उपलेखाशीर्षाचा संगणक संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच, कोषागारातून/ उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १४७/व्यय-३, दि. २०.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 202503271141117728 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2025.03.27 12:03:33 +05'30'

**( डॉ. रविंद्र भराटे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, महसूल (मदत व पुनर्वसन) विभाग, मंत्रालय मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
८. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
९. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

११. जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव
१२. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर
१३. जिल्हाधिकारी, धाराशिव
१४. मुख्याधिकारी, नगरपंचायत, लोहारा
१५. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१६. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव
१७. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. उप सचिव (पापु-१४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक
१९. निवडनस्ती पापु-१४